**महास्ट्राईड प्रकल्प राबविण्यासाठी प्रकल्प गुंतवणुक हिस्सा (IPF) अंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूबीके- २०२४/प्र.क्र. १४३ /का.१४१७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २८ मार्च, २०२५.

**संदर्भ**- १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्युबीके-२०२४/प्र.क्र.१३/ का-१४१७, दिनांक १४.०३.२०२४
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्युबीके-२०२४/प्र.क्र.६१/ का-१४१७, दिनांक १२.१२.२०२४
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इन्स्टिट्यूशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन-मित्र यांचे पत्र क्र. मित्र/महास्ट्राईड/ प्र.क्र.२१३/ २४, दिनांक १३.०३.२०२५

**शासन निर्णय :**

नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दिनांक १४.०३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये जागतिक बँक अर्थसहाय्यित महाराष्ट्र जिल्हास्तरीय विकासाला चालना देण्यासाठी संस्थात्मक क्षमता सक्षमीकरण प्रकल्प (Maharashtra Strengthening Institutional Capabilities in Districts for Enabling Growth Project-MahaSTRIDE) राबविण्यास व प्रकल्पासाठी आवश्यक असलेले मनुष्यबळ व सेवा उपलब्ध करून घेण्यासाठी, राज्य सुकाणू समितीची मान्यता घेण्यास व तद्नंतर शासनाने विहीत केलेल्या पद्धतीचा अवलंब करून कार्यवाही करण्यास मान्यता देण्यात आली आहे. नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील दिनांक १२.१२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये सदर प्रकल्पासाठी जागतिक बँकेकडून प्रकल्प गुंतवणुक हिस्सा ( IPF) अंतर्गत मिळणारा निधी आणि प्रकल्पाव IPF अंतर्गत होणाऱ्या खर्चासाठी स्वतंत्र लेखाशीर्ष निर्माण करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

२. महास्ट्राईड प्रकल्पाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने प्रकल्प व्यवस्थापन कक्षासाठी (PMU) अधिग्रहित केलेल्या सल्लागार संस्थाच्या मानधनावरील व अनुषांगिक ₹६४.०० लाख खर्च भागविण्यासाठी नियोजन विभाग, मागणी क. ओ-०७, ३४५१- सचिवालयीन-आर्थिक सेवा ००, ०९२ इतर कार्यालये (२०), (००) (०२) महाराष्ट्र जिल्हास्तरीय विकासास चालना देण्यासाठी संस्थात्मक क्षमता सक्षमीकरण प्रकल्प - MahaSTRIDE (बाह्य हिस्सा ७०% जागतिक बँक) (कार्यक्रम)३४५१A२१५ या लेखाशीर्षांखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून पुढीलप्रमाणे ₹६४.०० लाख निधी वितरण करण्यास प्रस्तुत शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

(रूपये हजारात)

| अ.क्र. | मागणी क्र. ०७<br>३४५१ - सचिवालयीन - आर्थिक सेवा | तपशीलवार शीर्ष | मंजूर अनुदान | वितरीत केलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | दत्तमत ०९२ - इतर कार्यालये (००) (०२) महाराष्ट्र जिल्हास्तरीय विकासाला चालना देण्यासाठी संस्थात्मक सक्षमीकरण प्रकल्प - महास्ट्राईड (बाह्य हिस्सा ७०%) (कार्यक्रम) ३४५१ A २१५ | १०-कंत्राटी सेवा | ₹२००००.०० | ₹६०००.०० |
| २ | | १३- कार्यालयीन खर्च | ₹१००००.०० | ₹४००.०० |
| एकूण | | | | ₹६४००.०० |

३. या उपशिर्षाखाली होणाऱ्या खर्चासाठी सह सचिव, महाराष्ट्र इन्स्टिट्यूशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन-मित्र हे नियंत्रक अधिकारी असतील व कक्ष अधिकारी, महाराष्ट्र इन्स्टिट्यूशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन-मित्र हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी "नियंत्रक अधिकारी" यांची राहील.

४. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर व वितरीत करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा. राज्य शासनामार्फत वेळोवळी निर्गमित करण्यात आलेले आदेश, शासन निर्णय, नियम, परिपत्रक यांची अंमलबजावणी करून उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. निधी खर्चाच्या अनुषंगाने भविष्यात लेखापरिच्छेद उद्भवल्यास त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी नियंत्रक अधिका-याची राहील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र.२०८/२०२५/ व्यय-८, दिनांक २६.०३.२०२५अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२५०३२८१८०५२८१८१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK BANSI GAIKWAD

Digitally signed by VIVEK BANSI GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=2dcd8a369b90c95da2ba1482ac5185a9b5d5d8a62596d71411bc96a1a7d9bad5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1ECC1A130CD0429F39A57C63D4B57C6C3ACFCA13C103BFF9F5EF5D51BD17AD08, cn=VIVEK BANSI GAIKWAD
Date: 2025.03.28 18:06:17 +05'30'

(विवेक गायकवाड )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति:**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इन्स्टिटयूशन फॉर ट्रान्सफॉर्मेशन- निर्मल भवन, नरीमन पॉईंट, मुंबई - २१
४. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. वित्त विभाग ( व्यय-८), मंत्रालय, मुंबई
७. नियोजन विभाग / कार्यासन- १४२५ अ, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती ( कार्यासन-१४१७)